**१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या १८ अतिरिक्त न्यायालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत ...**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांक : विशेन्या १३१८/प्र.क्र.५७/का- नऊ**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक :- ०३ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-**

१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.अेचसीटी-१००२/१२८९/(१६२)/नऊ , दि. ०८.०९.२००३.

२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.विशेन्या-१३१६/प्र.क्र.२०५/का-९ , दि. १८.०८.२०१७.

३) जिल्हा न्यायालय, सोलापूर क्र. आस्था/ब-४/८१०/२०१८, दि.०३.०८.२०१८ चे पत्र.

४) जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा जा.क्र.बी.एडीएम/१५/७६२५/२०१८, दि.०७.०८.२०१८ चे पत्र.

५) जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग क्र. प्रशा/४८१४ सन २०१८, दि.१७.०८.२०१८ चे पत्र.

६) जिल्हा व सत्र न्यायालय, औरंगाबाद जा.क्र. प्रशा/९७६६/२०१८, दि.०१.०८.२०१८ चे पत्र.

७) जिल्हा व सत्र न्यायालय, परभणी जा.क्र.आस्था/ब-४/८६९४/२०१८, दि.०१.०८.२०१८ चे पत्र.

८) जिल्हा व सत्र न्यायालय, नांदेड जा.क्र./ब-४(१०)/५८६१/२०१८, दि.०२.०८.२०१८ चे पत्र.

९) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८.

**प्रस्तावना :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत एकूण १८ अतिरिक्त न्यायालये स्थापन केलेली आहेत. या १८ अतिरिक्त न्यायालयासाठी संदर्भीय अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आली आहे. या १८ अतिरिक्त न्यायालयासाठीच्या अस्थायी पदांना पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देणे आवश्यक आहे. न्यायालयाच्या अस्थायी पदांबाबत संदर्भीय अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाच्या दि.१०.९.२००१ च्या शासन निर्णयातील तरतूदीमधुन वगळण्यात आले आहे. तसेच संदर्भीय अ.क्र.९ येथील

वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर १८ अतिरिक्त न्यायालयासाठीची अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या १८ अतिरिक्त न्यायालयासाठीच्या पुढील अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

जिल्हा न्यायाधीश/तदर्थ जिल्हा न्यायाधीश संवर्ग

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | न्यायाधीश | १४ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १४ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | १४ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | १४ |
| ५ | शिपाई | १४ |
| | **एकूण पदे** | ७० |
| ठोक वेतनावर बाह्ययंत्रणेद्वारे शिपाई -१४ | | |

दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) संवर्ग

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर | ४ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ४ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | ४ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | ४ |
| ५ | शिपाई | ४ |
| | **एकूण पदे** | २० |
| ठोक वेतनावर बाह्ययंत्रणेद्वारे शिपाई -४ | | |

२. याकरिता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५-दिवाणी व सत्र न्यायालये (०७) अतिरिक्त न्यायालये (०७)(०१) अतिरिक्त न्यायालये (२०१४ ०५७५), या लेखाशिर्षाखाली" खर्ची टाकण्यात यावा व तो त्या शीर्षाखालील सन २०१८-२०१९ या वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८१००४११५९००२७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: CN = Amogh Shyamkant Kaloti, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary Department
Date: 2018.10.04 12:04:03 +05'30'

**(अ. श्या. कलोती)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति :-**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ,

२) प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई

३) मुख्य महानगर न्यायदंडाधिकारी, मुंबई

४) जिल्हा व सत्र न्यायालय, सोलापूर, अमरावती, परभणी, पुणे, नागपूर, ठाणे, नांदेड, रायगड-अलिबाग, सातारा,नाशिक, औरंगाबाद.

५) महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,

६) महालेखापाल-एक/दोन ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,

७) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर, अमरावती, परभणी, पुणे, नागपूर, ठाणे, नांदेड, रायगड-अलिबाग, सातारा,नाशिक, औरंगाबाद.

८) वित्त विभाग व्यय-५,

९) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५

१०) निवड नस्ती- का. ९.